जिल्हा परिषदेतील जिल्हा सेवा, वर्ग-३ (सिंचन) संवर्गातील कनिष्ठ अभियंता यांची दि.१/१/२०१४ रोजीची तात्पुरती ज्येष्ठता सूची.

महाराष्ट्र शासन
ग्राम विकास विभाग
शासन परिपत्रक क्रमांकः झेडएनजी-२०१५/प्र.क्र.२९/आस्था-४
बांधकाम भवन, २५ मर्झबान पथ,
फोर्ट, मुंबई ४०० ००१.
दिनांक: २६ जून,२०१५

संदर्भ :-

१) या विभागाचे क्र.झेडएनजी-१०१४/प्र.क्र.१४/आस्था-४, दि.२८.३.२०१४ चे पत्र.
२) विभागीय आयुक्त, कोकण यांचे पत्र क्र.विकास/सेवाज्येष्ठता/कार्या-१/सिचन.से.ज्ये./२०१४, दि.११.९.२०१४.
३) विभागीय आयुक्त, नाशिक यांचे पत्र क्र.विआशा/कार्या-१९/आस्था-३/१७८६/२०१४, दि.१९.७.२०१४.
४) विभागीय आयुक्त, औरंगाबाद यांचे जा.क्र.२०१४/विशा-आस्था/झेडपीई/सीआर३४/कावि/१२६९, दि.२५.८.२०१४.
५) विभागीय आयुक्त, अमरावती यांचे पत्र क्र.विकास/आस्था/झेडएनजी/कावि-३७०/२०१४, दि.१०.९.२०१४.
६) विभागीय आयुक्त, पुणे यांचे पत्र क्र.विकास/आस्था-२(२)/कावि/२०/२०१४,दि.१७.९.२०१४.
७) विभागीय आयुक्त, नागपूर यांचे पत्र क्र.विशा/कार्या-११(४)/कावि-५८५/२०१४, दि.२२.८.२०१४.

शासन परिपत्रक :-

शासनाच्या संदर्भाधीन क्र.१ येथील पत्रान्वये जिल्हा परिषदेतील जिल्हा तांत्रिक सेवा वर्ग-३ मधील विविध संवर्गाच्या ज्येष्ठता याद्या विभागीय पातळीवर तयार करुन शासनास पाठविण्याबाबत सर्व विभागीय आयुक्त यांना कळविण्यात आले होते. त्यानुसार सर्व विभागीय आयुक्त यांचेकडून त्यांच्या विभागांतर्गत दि.१.१.२०१४ रोजी नियमित नियुक्त झालेल्या जिल्हा तांत्रिक सेवा वर्ग ३ (बांधकाम) संवर्गातील जिल्हा परिषदेतील कनिष्ठ अभियंता यांची माहिती संदर्भ क्र.२ ते ७ नुसार शासनास प्राप्त झाली आहे. त्याआधारे सदर संवर्गाची तात्पुरती ज्येष्ठता सूची तयार करण्यात आली आहे.

सदर दि.२.१.२०१३ ते दि.१.१.२०१४ या कालावधीची तात्पुरती ज्येष्ठता सूची सर्व संबंधितांच्या निदर्शनास आणावी व त्याबाबत संबंधितांचे काही आक्षेप व हरकती असल्यास त्या कार्यालयीन अभिलेख्यावरुन छाननी करुन आणि आक्षेप योग्य असल्याचे प्रमाणपत्र देवून विभागीय आयुक्त, मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांच्या शिफारशींसह खाली दिलेल्या विवरणपत्रात नमूद करुन संबंधित कागदपत्रांसह शासनाकडे पाठविण्यात याव्यात. आक्षेप न तपासताच शासनाकडे पाठविण्यात येवू नयेत. छाननी करुन न पाठविता प्राप्त झालेले तसेच संबंधितांनी परस्पर शासनाकडे पाठविलेले आक्षेप विचारात घेतले जात नाहीत. आक्षेप अर्ज विभागीय आयुक्त तसेच मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषदमार्फत शासनाकडे पाठविण्याचा शेवटचा दि.३१.७.२०१५ आहे. सदर दिनांकानंतर पाठविलेले आक्षेप शासन स्तरावर विचारात घेतले जाणार नाहीत, याची नोंद घ्यावी. तसेच दरम्यानच्या कालावधीत सेवानिवृत्त, स्वेच्छा सेवानिवृत्त, राजीनामा अथवा निधन झालेल्या, आंतरजिल्हा बदली झालेल्या कर्मचाऱ्यांचीदेखील नावे उचित नोंदीसह कळविण्यात यावीत.

| अ.क्र. | दि.१/१/१४ रोजीच्या तात्पुरत्या जेष्ठतासूचीतील अनुक्रमांक | कर्मचा-याचे नांव | जेष्ठतासूचीतील ज्या रकान्यामध्ये दुरुस्ती करावयाची आहे तो रकाना क्रमांक व असलेली सध्याची नोंद | सुचविलेली दुरुस्ती | अभिप्राय |
|---|---|---|---|---|---|
| | | | | | |

शासनाने यापूर्वी प्रसिद्ध केलेल्या ज्येष्ठता सूचींसंदर्भात असे निदर्शनास आले आहे की, सदर ज्येष्ठता याद्या संबंधितांच्या निदर्शनास आणण्यात येत नाहीत. त्यामुळे संबंधितांना त्याबाबतचे आक्षेप वेळीच नोंदविता येत नाहीत. बऱ्याचदा संबंधित कर्मचारी त्यांच्या पदोन्नतीच्या वेळी ज्येष्ठता सूचीत दुरुस्ती करण्याची विनंती करतात. अशा प्राप्त झालेल्या प्रत्येक विनंती अर्जानुसार ज्येष्ठतासूचीत आवश्यक ती दुरुस्ती करण्यासाठी वेळोवेळी शुद्धीपत्रके काढावी लागतात. तसेच यामुळे मानीव दिनांकाची प्रकरणे उद्भवतात. सबब सोबतची ज्येष्ठता यादी सर्व संबंधितांच्या तात्काळ निदर्शनास आणून द्यावी व तसे केल्याबाबतचे प्रमाणपत्र शासनास पाठवावे.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०६२६११४३१११५२० असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Kalpana Dinesh Samant

Digitally signed by Kalpana Dinesh Samant
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Desk Officer, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Kalpana Dinesh Samant
Date: 2015.06.26 14:43:40 +05'30'

(क.दि.सामंत)

कक्ष अधिकारी, ग्राम विकास व जलसंधारण विभाग.

प्रत,

१. विभागीय आयुक्त, सर्व विभाग,
२. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सर्व. (प्रत्येकी १५ प्रती)
३. सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
४. निवड नस्ती.

| जिल्हा तांत्रिक सेवा, वर्ग-३ (सिंचन) संवर्गातील जिल्हा परिषदेतील कर्मचाऱ्यांची दि.१/१/२०१४ रोजीची तात्पुरती ज्येष्ठता सूची | | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| अ.क्र. | ज्येष्ठता क्रमांक | कर्मचाऱ्याचे नाव | | जिल्हा परिषद | जन्मदिनांक | शैक्षणिक पात्रता | नियमित नियुक्तीचा दिनांक | जात प्रवर्ग | परीक्षा उत्तीर्ण/ सुट | शेरा |
| १ | २ | ३ | | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० |
| भाग-१ (पदवीधर) | | | | | | | | | | |
| १ | १३२ | श्री. | एस.एस.सेलुकर | भंडारा | २२-०२-१९७९ | बीई | ३१-०८-२०१३ | इमाव | -- | -- |
| २ | १३३ | श्रीम. | सारीका पाटील | यवतमाळ | २१-१२-१९८१ | बीई | ३१-१०-२०१३ | इमाव | -- | -- |
| ३ | १३४ | श्री. | सचिन डी.बेले | यवतमाळ | १५-०४-१९८७ | बीई | ३१-१०-२०१३ | अजा | -- | -- |
| ******** | | | | | | | | | | |
| भाग-२ (पदविकाधर) | | | | | | | | | | |
| १ | ११७-अ | श्री. | डी.के.बोराटे | पुणे | ०२-०६-१९६१ | डीसीई | **१८-११-१९८२** | इमाव | सुट | -- |
| २ | ५०६-अ | श्री. | डी.आर.हिरे | नाशिक | १३-१२-१९६२ | डीसीई | ११-१२-१९९३ | खुला | उत्तीर्ण | आ.जि.बदली |
| ३ | ७०८ | श्री. | एन.आर.बोहने | अमरावती | १६-०८-१९८८ | डीसीई | ३०-०७-२०१३ | खुला | -- | -- |
| ४ | ७०९ | श्री. | ए.एस.साळी | नाशिक | ०१-०४-१९८९ | डीसीई | २३-०९-२०१३ | विमाप्र | -- | -- |
| ५ | ७१० | श्रीम. | पी.जी.कराड | नाशिक | ३१-१०-१९९० | डीसीई | २४-०९-२०१३ | भज-ड | -- | -- |
| ६ | ७११ | श्रीम. | प्रशांत बा.कदम | यवतमाळ | १९-०२-१९७६ | डीसीई | ३१-१०-२०१३ | इमाव | -- | -- |

********